**<u>मजूर सहकारी संस्थांच्या कामांच्या सवलतीत सुधारणा करण्याबाबत.</u>**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक: ग्रासयो - २०१९/प्र.क्र.११२/ बांधकाम-२**
**बांधकाम भवन, सातवा मजला,**
**२५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.**
**दिनांक: ३० जून, २०२०**

<u>वाचा-</u>

१) शासन निर्णय ग्रा.वि.व ज.सं. क्र.संकिर्ण- २०१०/२७५/प्र.क्र.१७२/पंरा-७ , दिनांक १९ ऑक्टोंबर, २०११.

२) शासन निर्णय सा.बां.वि. क्र. सीएटी - २०१७/ प्र.क्र. १०३/इमारत-२, दिनांक २७ सप्टेंबर, २०१८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

ग्राम विकास विभागांतर्गत स्थानिक स्वराज्य संस्थांच्या अखत्यारितील विकास कामांच्या अनुषंगाने विविध बाबीसंदर्भात या विभागाच्या संदर्भाधीन अ.क्र. १ येथील दिनांक १९.१०.२०११ च्या शासन निर्णयानुसार धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यामध्ये मजूर सहकारी संस्था व सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांचे पंजीकरण करण्याबाबतही समावेश आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिनांक २३.०७.२०१८ व दिनांक २७.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये मजूर सहकारी संस्थांना देण्यात येणाऱ्या कामाच्या सवलतीत सुधारणा करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने त्यांना या विभागामार्फत देण्यात येणाऱ्या कामाच्या सवलतीतही एकवाक्यता राहण्याच्या दृष्टीने आवश्यक ती सुधारणा करण्याबाबत काही लोकप्रतिनिधी, मजूर सहकारी संस्था तसेच वैयक्तीक अर्जदार यांचेकडून निवेदने प्राप्त झाली आहेत.

सार्वजनिक बांधकाम विभागाने मजुर सहकारी संस्थांना देण्यात येणाऱ्या सवलतींबाबत केलेल्या सुधारणांचा अभ्यास करुन फक्त मजूर सहकारी संस्थांना कामे देण्याच्या संदर्भात ग्राम विकास विभागाच्या दि.१९.१०.२०११ पूर्वी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामधील संबंधीत तरतूदींमध्ये अधीक्रमीत करुन सुधारित तरतूदी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे मजूर सहकारी संस्थांना देण्यात येणाऱ्या कामाच्या सवलती संदर्भात पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :

१. **मजुर सहकारी संस्थांचे वर्गीकरण:-** मजूर सहकारी सस्थांचे अ व ब असे दोन वर्ग असतील.

१.१“अ” वर्ग मान्यताप्राप्त संस्था:- रु. ३० लक्ष पर्यंतची अंदाजित किंमतीची कामे घेण्यास सक्षम संस्था.

१.२ “ब” वर्ग मान्यताप्राप्त संस्था:- रु. १५ लक्ष पर्यंतची अंदाजित किंमतीची कामे घेण्यास सक्षम संस्था.

२. विनास्पर्धा कामे:-

२.१ विनास्पर्धा कामे:- मजूर सहकारी संस्थांना अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे अध्यक्षतेखालील काम वाटप समिती मार्फत विनास्पर्धा अंदाजपत्रकीय दराने कामे वाटप करण्यात येतात. अशा प्रत्येक कामाची अंदाजपत्रकीय किंमतीची कमाल मर्यादा रु. ३ लक्ष इतकी असेल.

२.२ ई-निविदा :- “अ” वर्ग मान्यताप्राप्त मजूर सहकारी संस्था नोंदणीकरणापासुन रु. ३ लक्ष ते रु.३० लक्षपर्यंत अंदाजीत किंमतीची कामे ई-निविदा पद्धतीने भरण्यास पात्र असतील आणि “ब” वर्ग मान्यताप्राप्त मजूर सहकारी संस्था नोंदणीकरणापासुन रु.३ लक्ष ते रु. १५ लक्षपर्यंत अंदाजित किंमतीची कामे ई-निविदा पद्धतीने भरण्यास पात्र असतील.

२.३ मजूर सहकारी संस्थेस काम वाटप करताना विनास्पर्धा वाटप झालेली आणि ई-निविदा पद्धतीने मिळालेली कामे अशा एकत्रित कामांची संख्या जास्तीत जास्त ३ असेल. कुठल्याही परिस्थितीत एका वेळी एका मजूर सहकारी संस्थेस तीनपेक्षा जास्त कामे घेता येणार नाहीत. संस्थेने हातावरील कामे यशस्वीरित्या पुर्ण करून काम पुर्ण झाल्याची नोंद संबंधीत कार्यकारी अभियंता यांनी नोंदवहीत केल्यानंतरच पुढील काम वाटप करणेसाठी संस्थेचा विचार करण्यात येईल. मजूर सहकारी संस्थेस एका वर्षात विनास्पर्धा आणि ई-निविदा पध्दतीने मिळून जास्तीत जास्त रु. १०० लक्ष किंमतीची कामे घेता येतील.

२.४ ग्राम विकास विभाग,शासन निर्णय क्र. झेडपीए-२०१५/प्र.क्र.१०/वित्त-९, दिनांक २५ मार्च,२०१५ मध्ये विहीत केलेली कामे करण्यास ग्राम पंचायतींनी असमर्थता दर्शविली असेल, अशी उपलब्ध होणारी कामे संबंधित जिल्हा परिषदांनी पुर्वी प्रमाणे ३३:३३:३४ या प्रमाणात मजूर सहकारी संस्था, सुशिक्षित बेरोजगार अभियंता व पात्र नोंदणीकृत नियमित कंत्राटदार यांना त्या- त्या गटांअंतर्गत निकोप स्पर्धा निर्माण होईल, अशा पद्धतीने कामवाटप ई-निविदा कार्य प्रणालीचा अवलंब करून देणे बंधनकारक राहील.

३. इसारा/ बयाणा रक्कम:-

मजूर सहकारी संस्थांना रु. ३०.०० लक्ष पर्यंतच्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांसाठी इसारा / बयाणा रकमेचा भरणा करण्यापासून सूट देण्यात येत आहे.

४. सुरक्षा ठेव रक्कम :-

अ) ज्या मान्यताप्राप्त मजूर सहकारी संस्थांनी रू. ३० लक्ष किंमतीपर्यंतची कामे घेतली आहेत, त्यांना जर जिल्हा परिषदेमार्फत सिमेंट, इमारती लाकूड, पोलाद, सिमेंट/लोखंडी पत्रे अथवा इतर साहित्य दिले नसेल तर त्यांच्याकडून सुरक्षा अनामत रक्कम वसूल करण्याची आवश्यकता नाही. मात्र बांधकामाला लागणारे वरील वा इतर अन्य साहित्य जर मजूर सहकारी संस्थांना जिल्हा परिषदेमार्फत देण्यात आले असेल तर नियमानुसार वसूल करावयाच्या सुरक्षा अनामत रक्कमेच्या ५० टक्के इतकी रक्कम सुरक्षा अनामत म्हणून अशा मजूर सहकारी संस्थेकडून घेण्यात यावी. एकूण कामाच्या १टक्के इतकी रक्कम (कमीत कमी

रु. १०,०००) कंत्राटदारांच्या कागदपत्रांवर सह्या करण्याच्या वेळी वसूल करावी व बाकीची रक्कम टप्प्याटप्प्याने मजूर सहकारी संस्थेला द्यावयाच्या देयकातून वसूल करण्यात यावी.

ब) मजुर सहकारी संस्थांनी ई-निविदा पद्धतीने कामे जर अंदाजपत्रकिय दरापेक्षा कमी दराने सादर केल्यास विहित शासन निर्णयाप्रमाणे अतिरिक्त सुरक्षा अनामत रक्कम भरणे अनिवार्य राहील.

५. <u>पतदारी प्रमाणपत्र :-</u>

मान्यताप्राप्त नोंदणीकृत मजूर सहकारी संस्थांना पतदारी प्रमाणपत्र देण्याच्या अटीतून सूट देण्यात यावी. मात्र संबंधित जिल्हा उप निबंधक (सहकार) किंवा सहकारी संस्थांकडून त्यांना देण्यात आलेले काम करण्याची आर्थिक पात्रता असल्याचा दाखला मजूर सहकारी संस्थांनी सादर करणे आवश्यक आहे.

६. एक किंवा दोन अथवा मोजक्याच निवडक विविक्षित मजूर सहकारी संस्थांना काम देण्याचे टाळावे. तसेच सर्वसाधारणत: एका मजूर सहकारी संस्थेला त्या संस्थेच्या आर्थिक व इतर मर्यादेपेक्षा अधिक काम देण्यात येऊ नये.

७. <u>तंट्याचे वेळी लवाद :-</u>

मजूर सहकारी संस्था व काम देणारा संबंधित विभाग यांचेमध्ये वाद/तंटा निर्माण झाला तर अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांचा निर्णय अंतिम असेल. हा निर्णय लवादाचा निर्णय म्हणून न राहता प्रशासकीय निर्णय म्हणून मानला जाईल.

८. <u>गोपनीय अहवाल :-</u>

मान्यता प्राप्त व नोंदणीकृत मजूर सहकारी संस्था यांच्या कामाबाबतचा गोपनीय अहवाल काम पूर्ण झाल्यानंतर संबंधित कार्यकारी अभियंता हे लिहितील आणि तो अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेकडे सादर करतील व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे सदरील गोपनीय अहवाल जतन करतील. मजूर सहकारी संस्थांना दिलेल्या कामांची अद्ययावत नोंद महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती लेखा संहिता १९६८ च्या १४७ प्रमाणे नमुना क्र. ४८ मध्ये ठेवण्यात यावी. मजूर सहकारी संस्थांच्या नुतनीकरणाच्या वेळी या गोपनीय अहवालांमधील शेऱ्यांचा विचार करण्यात यावा. जर मजूर सहकारी संस्थेच्या गोपनीय अहवालात प्रतिकुल शेरे नोंदविले असतील तर अशा मजूर सहकारी संस्थांचे नुतनीकरण करण्यात येऊ नये.

९. मजूर सहकारी संस्थांच्या वर्गीकरणाचे नूतनीकरण ५ वर्षांनी करण्यात येईल. नूतनीकरणाच्या वेळी संबंधित मजूर सहकारी संस्थेच्या गोपनीय अहवालातील शेऱ्यांचा विचार करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००६३०१३२९२१८४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Eknath Kashinath Gagare

Digitally signed by Eknath Kashinath Gagare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=d9a3ccbc053d2cf9b4c30c85bb8db0e6c39331b90d48b0aba6cde387b5ec208c, serialNumber=6bc79f4a08ca2d5d74e02e7214f6aad4ef7d9afdeba5bfcdef24d45049099939, cn=Eknath Kashinath Gagare
Date: 2020.06.30 16:30:02 +05'30'

(एकनाथ गागरे)
उप सचिव, **महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
३. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई.
४. सर्व विभागीय आयुक्त.
५. सर्व जिल्हाधिकारी.
६. मा.मंत्री, ग्रामविकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.राज्यमंत्री, ग्रामविकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
८. सर्व उप सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषद.
१०. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
११. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषद.
१२. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, सर्व जिल्हा परिषद.
१३. सर्व अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था.
१४. कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, सर्व जिल्हा परिषद.
१५. अतिरिक्त मुख्य सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग यांचे स्वीय सहायक, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
१६. सचिव, मुख्यमंत्री ग्राम सडक योजना यांचे स्वीय सहायक, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
१७. निवड नस्ती, कार्यासन बांधकाम-२, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.